**संयुक्त सागरी गस्त सन २०११-१२ मधील**
**खाजगी नौकांचे भाडे अदा करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः डिआयएस १०१२/ प्र.क्र. ३४५/पुर्न. क्र ६५/विशा-४

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मुंबई ४०० ०३२
तारीख: २२ जून, २०१५.

**वाचा :** १ )शासन निर्णय क्रमांक: आयएसएस- १००८/प्र.क्र. ८०८ (२)/विशा-४, दि. ५.१.२००९
२) शासन निर्णय क्रमांक: डिआयएस-०४०९/प्र.क्र. २२१/विशा-४, दि. ११.८.२००९.
३) शासन ज्ञापन क्रमांक: डिआयएस-२०१०/प्र.क्र. ४४५/विशा-४, दि. ३१.३.२०१०.
४) शासन ज्ञापन क्र. डिआयएस २०११/ प्र क्र २०१/ विशा-४, दि. १६.८.२०११.
५) शासन ज्ञापन क्र. डिआयएस ०७०९/ प्र क्र ३४५/ विशा-४, दि. ३१.३.२०१२.
६) विशेष पोलीस महारिक्षक(प्रशासन), पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्र. पोमंस/३३/७१२५/लेखा अनुदान २०१२-१३/०५/२०१२, दि. २३.९.२०१४.
७) अपर पोलीस आयुक्त, दक्षिण प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. ५७४२/अपोआ/ दप्रावि/कक्ष-६/२०१४, दि. २१.८.२०१४.
८) अपर पोलीस आयुक्त, दक्षिण प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. २१६२/अपोआ/ दप्रावि/कक्ष-६/२०१४, दि. १९.३.२०१५.

**प्रस्तावना :-**

शासन ज्ञापन गृह विभाग क्र.डीआयएस ०६०९/प्र.क्र.३४५/विशा-४, दि.३१ मार्च, २०१२ अन्वये संयुक्त सागरी गस्ती करीता भाडेतत्वावर घेतलेल्या खाजगी नौकांचे भाडे अदा करण्यासाठी जिल्हादंडाधिकारी, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या नियंत्रक अधिकाऱ्यांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी खालीलप्रमाणे रक्कम वितरीत करण्यात आलेली होती.

| अ.क्र. | नियंत्रक अधिकारी | रक्कम |
|---|---|---|
| १ | जिल्हादंडाधिकारी, रायगड | रु. १०,६७,५००/- |
| २ | जिल्हादंडाधिकारी, रत्नागिरी | रु. २५,२२,६९६/- |
| ३ | जिल्हादंडाधिकारी, सिंधुदुर्ग | रु. ३,८१,०२८/- |
| | एकुण | रु. ३९,७१,२२४/- |

सदर रक्कम कोषागारातून काढून वरील नियंत्रित अधिकाऱ्यांना वितरीत करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्राधिकृत करण्यात आले होते. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांनी दि.१३.३.२०१३ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार शासन ज्ञापन गृह विभाग क्र.डीआयएस ०६०९/प्र.क्र.३४५/विशा-४, दि.३१ मार्च, २०१२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे जिल्हादंडाधिकारी, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या नियंत्रक अधिकाऱ्यांना रक्कम अदा करण्याबाबतची कार्यवाही झालेली नाही.

२. अपर पोलीस आयुक्त, दक्षिण प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी दि.२९.१२.२०१२ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार संयुक्त सागरी गस्तीसाठी सन २००९-१० व सन २०१०-११ या कालावधीकरिता अनुक्रमे रु.५३००/- व रु.७०००/-प्रतिदिनी प्रति नौका भाडेदराने ३ नौका अधिगृहीत करण्यात आल्या होत्या. तथापि केंद्र शासनाच्या दि.११.१२.२००८ च्या सूचनांनुसार अधिगृहीत नौकांचे भाडे अदायगीच्या प्रतिपूर्तीसाठी कमाल मर्यादा रु.१.३० लक्ष प्रति नौका प्रति महिना इतकी निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार संबंधितांना सदर मर्यादेनुसार भाडयाची रक्कम अदा करण्यात आली आहे. तथापि प्रत्यक्षात अदा करण्यात आलेली रक्कम व करारानुसार अदा करावयाची रक्कम यामधील फरकाची रक्कम संबंधितांना देय आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे फरकाची रक्कम अदा करण्याची आवश्यकता आहे.

| **अ.क्र.** | **ठेकेदाराचे नांव** | **कालावधी** | **फरकाची रक्कम (रुपये)** |
|---|---|---|---|
| १ | व्ही.डी.कोळी | ३१.३.२०१० ते १०.७.२०११ | ८,२०,१९८/- |
| २ | श्री.के.एल.कोळी | ३१.३.२०१० ते २९.५.२०११ | ६,६६,५३७/- |
| ३ | श्री.एन.एन.वेसावकर | ३१.३.२०१० ते २९.५.२०११ | ६,३२,४८०/- |
| | एकूण | | २१,१९,२५०/- |

३. तटरक्षक दलातर्फे वर्षाला २ सागर कवच अभियान राबविण्यात येतात. सन २०११ मध्ये आयुक्त, राज्य गुप्त वार्ता विभाग यांनी पोलीस आयुक्त, मुंबई यांना केलेल्या विनंतीनुसार सदर अभियानाकरीता दि.३.११.२०११ ते दि.५.११.२०११ या ३ दिवसांच्या कालावधीसाठी प्रति नौका दरदिवशी रु.३०,०००/- या दराने खाजगी मच्छीमार नौका भाडयाने घेवून अपर पोलीस उपायुक्त, बंदर परिमंडळ, मुंबई यांचेमार्फत तटरक्षक दलास पुरविण्यात आल्या होत्या. त्याचा एकूण खर्च रु.१,८०,०००/- एवढा झाला. त्याप्रमाणे सदरची रक्कम संबंधितांना देय आहे.

अशा प्रकारे संयुक्त सागरी गस्ती करीता मच्छिमारांकडून घेतलेल्या खाजगी नौकांचे थकीत असलेले एकूण रु.६२,७०,४७४/- (३९,७१,२२४/- + २१,१९,२५०/- + १,८०,०००/-) इतकी रक्कम संबंधितांना अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

संयुक्त सागरी गस्ती करीता मच्छिमारांकडून भाडेतत्वावर घेतलेल्या खाजगी नौकांचे थकीत असलेले भाडे अदा करण्यासाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष २०५५- पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस-(००) (०१) जिल्हा पोलीस दल (२०५५ ०१६८) या योजनेत्तर योजनेअंतर्गत ४२- ठोक तरतुद या उदिष्टातंर्गत उपलब्ध तरतूदीतुन रु. ६२,७०,४७४/- (अक्षरी रुपये बासष्ट लाख सत्तर हजार चारशे चौऱ्याहत्तर फक्त) इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नियंत्रक अधिकारी | रक्कम |
|---|---|---|
| १ | जिल्हादंडाधिकारी, रायगड | रु. १०,६७,५००/- |
| २ | जिल्हादंडाधिकारी, रत्नागिरी | रु. २५,२२,६९६/- |
| ३ | जिल्हादंडाधिकारी, सिंधुदुर्ग | रु. ३,८१,०२८/- |
| ४ | अपर पोलीस आयुक्त, दक्षिण प्रादेशिक विभाग, मुंबई | रु. २१,१९,२५०/- |
| ५ | पोलीस उप आयुक्त, बंदर परिमंडळ, मुंबई | रु. १,८०,०००/- |
| | एकुण | रु. ६२,७०,४७४/- |

२. वितरीत केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे. तसेच महालेखापाल कार्यालयाशी याचा खर्चमेळ घालून त्याचे प्रमाणपत्रही शासनास सादर करावे.

३. सदर रक्कम मासिक निधी विवरणानुसारच खर्च होईल याची दक्षता नियंत्रण अधिकारी यांनी घ्यावी.

४. प्रस्तुत रक्कम कोषागारातून काढून संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना वितरीत करण्यास पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम वितरीत करताना कोणतीही प्रशासकीय अथवा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता पोलीस महासंचालक कार्यालयाने घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२२१३०३४८१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.22 15:48:49 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
उप सचिव, गृह विभाग

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/नवी मुंबई / ठाणे शहर
३. आयुक्त, राज्यगुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. विशेष पोलीस महानिरिक्षक, कोकण परिक्षेत्र.
५. पोलीस अधीक्षक, ठाणे (ग्रा.)/ रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग
६. जिल्हाधिकारी व जिल्हा दंडाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर / ठाणे/ रायगड / रत्नागिरी /सिंधुदुर्ग
७. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
९. अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.अपर जिल्हा कोषागार अधिकारी, नवी मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.